महाराष्ट्रातील कारागृहांना अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एमएजे-०१९८/२[१०१]/पोआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- २७ जानेवारी १९९९.

वाचा:- १] महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय, क्रमांक-डीएसपी-०८७७/ ९[११५]/पोआरएस-२, दिनांक ७. १०. १९७८.

२] महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय, क्रमांक-एमएजे-११८८/१/ [१५५]/पोआरएस-२, दिनांक १३. २. १९८९.

३] महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय, क्रमांक-एमएजे-०१९८/२[१०१] पोआरएस-२, दिनांक ११. १. १९९९.

४] महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कन्झ्युमर्स फेडरेशन लि., मुंबई यांचे दिनांक १८. १.१९९९ चे पत्र.

शासन निर्णय:- महाराष्ट्र राज्यातील कारागृहांना अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा करण्याबाबत शासनाने, गृह विभाग, शासन निर्णय, क्रमांक-एमएजे-०१९८/ २[१०१]/पोआरएस-२, दिनांक ११. १. १९९९ अन्वये महिला आर्थिक विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई या शासन पुरस्कृत संस्थेस द्यावयाचा निर्णय घेतला असून हा पुरवठा कोणत्या तत्त्वावर व अटीवर करावयाचा या संबंधीच्या अटी व शर्ती नंतर कळविण्यांत येतील असेही सदर शासन निर्णयामध्ये नमूद करण्यांत आलेले आहे. त्या अनुषंगाने सदर मालाचा पुरवठा यापूर्वी महाराष्ट्र राज्य मार्केटिंग फेडरेशन या संस्थेस ज्या अटींच्या आधारे करण्यास परवानगी देण्यांत आली होती त्याच अटी व शर्ती महिला आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या संस्थेस घालून अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा तूर्त करण्याबाबत आदेश देण्यांत येत आहेत. सदर पुरवठा हा या आदेशाच्या निर्गमनाच्या दिनांकापासून करण्यांत यावा. तूर्त अटी सोबत जोडल्या आहेत. सविस्तर अटी व कार्यपध्दती नंतर ठरविण्यांत येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ह. भि. तायडे ]
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह उप महानिरीक्षक [तुरुंग]

सर्व तुरुंग अधीक्षक.

प्रिन्सीपाल, बोर्स्टल स्कूल, कोल्हापूर.

महालेखापाल-१ [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र, मुंबई.

कार्यकारी संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,

.. २.

.. २.

महालेखापाल-१ [लेखा परीक्षा] महाराष्ट्र, मुंबई.

महालेखापाल-२ [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र, नागपूर.

महालेखापाल-२ [लेखा परिक्षा] महाराष्ट्र, नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

कृषी व सहकारी विभाग [२४ सी] मंत्रालय, मुंबई.

वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

" परिशिष्ट-अ"

गृह विभाग, शासन निर्णय, क्रमांक-एमएजे-०११८/२[१०१]/पोआरएस-२, दिनांक ११.१.१९९९ संबंधीत अन्नधान्य व खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा करण्यासाठी आवश्यक असलेल्या अटी व शर्ती.

१] कारागृहांना खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा करण्याबाबत सन १९९९ सालाकरिता मोहरबंद निविदा जास्त प्रमाणात प्रसिध्दी देऊन मागविण्यात याव्यात. निविदा सूचनांची जाहिरात स्थानिक वर्तमानपत्रात देण्यात यावी आणि निविदा सूचनांची प्रत महाराष्ट्र स्टेट को-ऑप. कंझ्युमर्स फेडरेशन व इतर सहकारी संस्था आणि प्रमुख ठोक व्यापाऱ्यांना पाठविण्यात याव्यात.

२] अन्नधान्याच्या पुरवठ्यामध्ये गहू, ज्वारी, तांदूळ आणि साखर या वस्तूंचा समावेश इतर वस्तूबरोबर निविदा सूचनांमध्ये करण्यात यावा. तसेच गोडेतेल, हिंग [खडा], हळद [अखंड] या वस्तूंचे दर निविदामध्ये मागवावेत व याचा स्पष्ट खुलासा निविदा सूचनेमध्ये करण्यात यावा.

३] कारागृहात दुय्यम प्रतीच्या खाद्योपयोगी वस्तूंची आवश्यकता असते. त्यानुसार महिला आर्थिक विकास महामंडळ मर्यादित मुंबई यांनी दुय्यम प्रतीच्या मालाचा पुरवठा करावा. सदर मालाच्या दराबाबत इतर अनुषंगिक खर्च, वहातूक भाडे याचा विचार करुन कारागृहापर्यंत माल पोच होईपर्यन्तच्या खर्चासह महिला आर्थिक विकास महामंडळाने बिले द्यावीत. सदरच्या बिलांची तुलना करतांना संबंधित जिल्हाधिकारी किंवा जिल्हा अन्नधान्य पुरवठा अधिकारी यांनी दुय्यम प्रतीच्या मालाच्या सर्व अनुषंगिक खर्चासहीत विचार करुन दर द्यावेत जेणेकरुन महिला आर्थिक विकास महामंडळ व कारागृह अधीक्षक यांच्यामध्ये पुरवठ्यासंबंधी व दरासंबंधी मतभेद होणार नाहीत.

४] ज्या जिल्ह्यातील कारागृहात महिला आर्थिक विकास महामंडळाकडून ज्या तारखेस खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा होईल त्या जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी यांनी त्या त्या दिवसाच्या [illegible] दुय्यम प्रतीच्या मालाचा प्रचलित दर द्यावा.

५] सदरचे दर जिल्हाधिकारी किंवा अन्नधान्य पुरवठा अधिकारी यांच्या स्वाक्षरीने द्यावेत.

६] महिला आर्थिक विकास महामंडळाकडून मालाचा पुरवठा होऊन संबंधित जिल्हाधिकाऱ्याकडून दर प्राप्त झाल्यानंतर साधारणत: एक महिन्याने बिलाची रक्कम महिला आर्थिक विकास ~~महामंडळ~~ महामंडळाला अदा केली जाईल.

७] कारागृहाकडून महिला आर्थिक विकास महामंडळाला बिले प्रदान झाल्यानंतर त्यांना दराबाबत कांही शंका आल्यास त्यांनी एक महिन्याच्या आंत कारागृह अधीक्षकांशी संपर्क साधून शंकेचे निरसन करुन घ्यावे. त्यानंतर त्यांची कुठलीही तक्रार स्वीकारली जाणार नाही.

८] भाजीपाला, मटण, अंडी, ब्रेड, दूध इत्यादी नाशिवंत वस्तू व जळावू लाकूड या बाबी वगळून इतर खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत केला जावा. कारण या वस्तूचा व्यापार महिला आर्थिक विकास महामंडळ करीत नाही.

९] कारागृह विभागात विविध कारागृहांकडे बरेच लागवडी योग्य क्षेत्र असून त्यामध्ये प्रामुख्याने भाजीपाल्याचे उत्पादन घेतले जाते व ते त्याच किंवा नजिकच्या कारागृहाच्या उपयोगासाठी पाठविले जाते. तसेच कांही कारागृहांकडे डिझेल बर्नर सेट बसविले असून जरुरीपुरते शेतीमधून जळाऊ लाकूड उपलब्ध होऊ शकते. त्यामुळे वरील वस्तूची खरेदी करणे आवश्यक वाटल्यास संबंधित कारागृह अधीक्षक तुलनात्मक दराने स्थानिक बाजारातून खरेदी करुन घेतील.

१०] वर नमूद करण्यांत आलेल्या अटींच्या परिपालनास बांधील राहून महिला आर्थिक विकास महामंडळ मर्यादीत यांना महाराष्ट्र राज्यातील सर्व कारागृहांना अन्नधान्याचा व इतर खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा करणे आवश्यक राहील.

---